**गौण खनिजाच्या उत्खनन व वाहतूकीस परवानगी देण्याबाबत करावयाची कार्यवाही.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः गौखनि १०/०३१६/प्र.क्र.२०४/ख**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
तारीख: १४/०६/२०१७

<u>वाचा :</u> (१) महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३
(२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. गौखनि १०/०५१२/प्र.क्र. ३००/ख, दि. १२ मार्च, २०१३
(३) केंद्र शासन, पर्यावरण, वने व वातावरणीय बदल मंत्रालय अधिसूचना क्र.:एस ओ.१४१(E), दिनांक १५ जानेवारी, २०१६
(४) शासन पत्र महसूल व वन विभाग क्र.: गौखनि १०/०२१६/प्र.क्र. १५८/ख, दि. २४ फेब्रुवारी, २०१६ व दिनांक २२ मार्च, २०१६

**-: शासन परिपत्रक :-**

संदर्भाधिन क्रमांक १ येथील महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३ अन्वये गौण खनिजाच्या उत्खनन व वाहतूकीस परवानगी देण्याबाबत अनुसरावयाची कार्यपध्दती विहित करण्यात आलेली आहे. तसेच संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये वाळू निर्गतीकरीता अनुसरावयाची कार्यपध्दती शासनाने विहित केलेली आहे. तथापि, गौण खनिजाचे उत्खनन व वाहतूकीबाबत संबंधित कायद्यातील तरतूदीची प्रभावी अंमलबजावणी होत नसल्याबाबत लोकप्रतिनिधी, जनता व प्रसारमाध्यामांतून मोठया प्रमाणावर राज्य शासनाकडे तक्रारी प्राप्त होत आहेत. त्याअनुषंगाने गौण खनिजाच्या उत्खनन व वाहतूकीस परवानगी देण्यासंबंधी साकल्याने विचार केल्यानंतर खालीलप्रमाणे कार्यवाही करण्याचे निर्देश या शासन परिपत्रकान्वये देण्यात येत आहेत :-

(i) महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३ मधील नियम २ (ज) नुसार गौण खनिजांचे उत्खनन व वाहतूकीसाठी परवाना देण्याचे अधिकार, तहसीलदार यांना ५०० ब्रास पर्यंत, उपविभागीय अधिकारी यांना ५०१ ते २,००० ब्रासपर्यंत व जिल्हाधिकारी यांना २,००१ ते २५,००० ब्रासपर्यंत, प्रदान करण्यात आलेले आहेत. उक्त नियमामधील नियम ५८ मध्ये जिल्हा खाणकाम योजना तयार करण्यासाठी जिल्हाधिकारी

यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठित करण्यात आली आहे. सदर खाणकाम योजनेस जिल्हास्तरीय पर्यावरण परिणाम व्यवस्थापन प्राधिकरणाने मान्यता दिल्यानंतर, प्रकरणपरत्वे गौण खनिज उत्खननाचे परवाने देण्याविषयी निर्णय संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या स्तरावर विनाविलंब घेण्यात यावेत. सदर परवाना देण्यासाठी परत जिल्हास्तरीय पर्यावरण परिणाम व्यवस्थापन प्राधिकरणाची (District Environment Impact Assessment Authority) मान्यता घेण्याची आवश्यकता नाही.

(ii) उक्त नियमामधील नियम ६५ मध्ये सक्षम अधिकारी अर्ज प्राप्त झाल्यावर, आवश्यक त्या कागदपत्रांची पडताळणी केल्यानंतर असा अर्ज मिळाल्यापासून ३० दिवसांच्या कालावधीत, त्याला योग्य वाटेल त्याप्रमाणे परवाना देईल किंवा त्यास नकार देईल अशी तरतूद करण्यात आली आहे. उक्त विहित कालावधीत अशा प्रकरणी न चुकता निर्णय घेण्याची दक्षता घेण्यात यावी.

(iii) संबंधित परवानाधारक यांनी गौण खनिज उत्खननाच्या परवान्याची मुदत किंवा त्याअंतर्गत मंजूर परिमाण संपण्यापूर्वी किमान ३० दिवस आधी सक्षम प्राधिकाऱ्याकडे अर्ज करणे बंधनकारक असेल. वरीलप्रमाणे विहित मुदतीत अर्ज केल्यावरही संबंधित सक्षम प्राधिकारी यांनी सदर अर्जावर पूर्वीच्या परवान्याची मुदत संपल्यानंतर किंवा मंजुर परिमाणाचे उत्खनन संपल्यानंतर नवीन परवाना देण्याचा निर्णय घेतल्यास, पूर्वीच्या परवान्याचा कालावधी संपुष्टात आल्यापासून किंवा पूर्वीच्या परवान्यातील मंजुर परिमाणाचे उत्खनन संपल्याच्या दिनांकापासून नवीन परवाना मंजुर होईपर्यंतचा कालावधी परवान्याच्या कालावधीत धरण्यात यावा व या कालावधीत परवानाधारकाने केलेले उत्खनन अवैध समजण्यात येऊ नये व त्यावर दंडात्मक कारवाई न करता अनुज्ञेय स्वामित्वधन व इतर शुल्काची वसूली करण्यात यावी.

(iv) वाळू उत्खननाबाबत तसेच नदीपात्रातून उत्खननाबाबत केंद्र शासनाच्या पर्यावरण, वने व वातावरणीय बदल मंत्रालयाच्या अधिसूचना क्र.: का.आ. १४१ (अ) दि. १५.०१.२०१६ मधील परिशिष्ट-१२ मध्ये विहित केल्यानुसार संनियंत्रणाची प्रक्रिया राबविण्यात यावी. तथापि, सदर परिशिष्ट इतर गौण खनिजे जसे की मुरुम, माती, काळा दगड व जांभा दगड इत्यादींबाबत लागू नाही याची कृपया नोंद घ्यावी.

२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०६१३१७५३०७८८१९ असा आहे. सदर शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Kshirsagar

Digitally signed by Rajendra Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3e673df1a1f6243d932fcb8679fc8cd85d90c61495ae8b4592f8dcc5b8a851a8, cn=Rajendra Kshirsagar
Date: 2017.06.14 13:42:48 +05'30'

**( राजेंद क्षीरसागर )**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई. (पत्राने)
२) मा.मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) सर्व मा.मंत्री व सर्व मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई.
७) सर्व मंत्रालयीन विभाग.
८) प्रधान मुख्य वन संरक्षक, नागपूर
९) सर्व विभागीय आयुक्त.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, बेलार्ड इस्टेट, मुंबई-४०० ००१

११) सर्व जिल्हाधिकारी.

१२) संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.

१३) सर्व उपविभागीय अधिकारी.

१४) सर्व तहसिलदार.

१५) महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), मुंबई.

१६) महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), नागपूर.

१७) सर्व कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१८) निवडनस्ती "ख" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुबई ४०० ०३२.